

# ॲनी सुलीवन

# हेलन केलरची शिक्षिका

हेलनची शिक्षिका म्हणून ॲनी सुलीवन काम करु लागली. हेलनला दिसत नव्हते की बोलता-ऐकायला येत नव्हते. हेलनला शिकवणे अगदी अवघड होते. पण ॲनीने ते स्वीकारले. जेव्हा एनी सुलीवन छोटी होती तेव्हा तिला कमी दिसायचे. तिला स्पष्ट दिसत नसल्याने ती ब्रेल लिपी शिकली होती. त्यानंतर डॉक्टरच्या मदतीने तिचे डोळे चांगले झाले. मग हाताला जे पुस्तक मिळेल ते वाचायला तिने सुरुवात केली.

त्यानंतर ॲनी सुलिवन  काम खूप चोख केले, हेलन मोठी झाल्यावर खूप सक्षम झाली आणि ॲनी सुलिवन एक चांगली शिक्षिका म्हणून ओळखली गेली.

घोडागाडी एका जुन्या इमारतीजवळ येऊन थांबली. त्यातून दोन मुले उतरली. एक होती ॲनी सुलीवन, दहा वर्षांची आणि तिचा भाऊ जिमी, सहा वर्षांचा. ॲनी तिचे डोळे मिचकावत होती कारण उजेडाने तिच्या डोळ्यांना त्रास होई. ती जवळपास दृष्टीहीन होती. जिमीला दिसायचे, पण तो लंगडा होता.

“आपण कुठे आलोत?” ॲनीने विचारले.

ते आले होते मेसाचसेट्समधील एका गरिब मुलांच्या आश्रमात. ॲनी आणि जिमी तिथे रहायला आले होते. त्यांच्या कुटुंबामध्ये त्यांची जबाबदारी घेणारे कोणीच नव्हते. त्यांना रहायला घरही नव्हते.



ॲनीने जिमीचा हात घट्ट धरुन ठेवला जेणेकरुन तो कुठे जाऊ नये. त्यांना एका छोट्या खोलीत नेण्यात आले. जिमीने ॲनीला सांगितले की खोलीत एक टेबल, खुर्ची आणि पलंग आहे.

त्यावेळी गरीब मुले अशा आश्रमात रहायची. फक्त मुलेच नाही, तर अशा आश्रमात सर्व वयाच्या लोकांची गर्दी असायची. काही वृद्ध होते, काही अंध तर काही अपंग होते.





जिमी खूप अशक्त होता. अनाथालयात आल्यावर काहीच महिन्यात त्याचा मृत्यु झाला. ॲनी खूप खूप रडली. ॲनी आता खरच एकटी पडली.





पण ॲनी आश्रमातल्या लोकांना आवडायची. ती खूप हुषार आणि उत्साही होती. आणि जसजशी ती मोठी होऊ लागली तशी ती चतुरही झाली. तिचे केस काळेभोर होते. ती हसरी होती. आश्रमातल्या तिच्या मित्रांनी तिला अंधांसाठी शाळा असतात असे सांगितले. तिला संधी मिळाली तर ती शिकंआर हे नक्की होते.

एके दिवशी काही मोठे लोक अनाथाश्रम पहायला आले. ॲनी धावतच त्यांच्याजवळ गेली आणि तिला शाळेत जायचे असल्याचे सांगितले. एका माणसाने तिला मदत करण्याचे वचनही दिले. त्यानंतर काहीच दिवसात ॲनीने बोस्टनच्या पर्किन्स इंस्टीट्यूटमध्ये जायची तयारी केली.





ॲनीने आधीपासूनच पर्किन्सबद्दल ऐकले होते.अंध मुलांसाठी ती प्रसिद्ध शाळा होती. तिथे लौरा ब्रिजमैन नावाच्या एका मुलीला डॉ. सैम्युअल ग्रिडले होव यांनी शिकवले होते. लॉरा ना बोलू शकत होती, ना ऐकू शकत होती, ना बघू शकत होती. ती लोकांच्या हातावर अक्षरे किंवा शब्द “टॅप”करुन संवाद साधायची. आणि तेही तिच्याशी अशा टॅपिंगने बोलायचे. डॉ होव आता हयात नव्हती. लॉरा ब्रीजमैन म्हातारी झाली होती पण पर्किन्समध्येच रहात होती.



ॲनी खूप उत्साही होती. बोस्टनला जातानाच्या रेल्वेप्रवासात तिने नवे कपडे घातले. तिचा ड्रेस खूप तोकडा होता आणि उंच टाचेचे काळे बूट खूप घट्ट होत होते. पण तरीही ॲनीला ते छान वाटत होते. ॲनी चौदा वर्षांची होती आणि चार वर्षांपासून अनाथाश्रमात रहात होती. ते अनाथाश्रम सोडताना ती खूष झाली होती.

पर्किन्समधले ॲनीचे आयुष्य सोपे नव्हते. तेथील बऱ्याचशा मुली श्रीमंत घरातल्या होत्या. त्या श्रीमंत मुली एका अनाथाश्रमातल्या मुलीसोबत मैत्री करु इच्छित नव्हत्या. ॲनी त्यांना खूप गावंढळ आणि शिष्ट वाटे.



ॲनीला सुरुवातीला लहान मुलांच्या वर्गात बसवले. पण नंतर ती तिच्या वयाच्या मुलांसोबत उत्तीर्ण झाली. त्यानंतर तिला ती शाळा आवडू लागली. ब्रेल शिकण्यासाठी तिने खूप कष्ट घेतले. कागदावर टोचलेली उठावदार बिंदूची भाषा म्हणजे ब्रेल. ज्याला स्पर्श करुन अंध लोक वाचतात.

**ब्रेल अक्षरमाला**



अॅनीला काही दिवसांनंतर डोळयांच्या ऑअपरेशनसाठी हॉस्पिटलमध्ये पाठवण्यात आले. ऑपरेशननंतर तिला अधिक चांगले बघता येऊ लागले. आता ती तिच्या डोळयांनी आणि हातांनीसुद्धा वाचू शकत होती. खरतर, तिला जे मिळेल ते प्रत्येक पुस्तक ती वाचत होती. ती रात्री उशिरापर्यंत वाचत बसायची. डॉक्टरांनी तिला डोळयांची काळजी घेण्याचा सल्ला दिला कारण तिचे डोळे कधीच पूर्ण बरे होणार नव्हते. पण अॅनीला भरपूर काही जाणून घ्यायचे होते! ती डोळे दुखेपर्यंत वाचत रहायची.



विसाव्या वर्षी ॲनी पर्किन्स इंस्टिट्यूट्मधून ग्रॅज्युएट झाली. ती वर्गातून पहिली आली. तिच्या एका शिक्षिकेने तिच्यासाठी सुंदर पांढरा ड्रेस शिवला. ॲनीने तो गर्वाने घातला. तो दिवस तिच्यासाठी सर्वात आनंदाचा दिवस होता.
ॲनी ग्रॅज्युएट झाल्याझाल्या तिला जॉब मिळाला.

अलबामाचे कप्तान आणि श्रीमती केलन ह्यांना त्यांच्या लहान मुलीसाठी, हेलेनसाठी शिक्षिका हवी होती. ती सहा वर्षांची मुकी, बहिरी, अंध मुलगी होती. ती जन्मतः अपंग नव्हती. पण दोन वर्षाची व्हायच्या अगोदरच एका आजाराने तिची दृष्टी, ऐकण्या-बोलण्याची क्षमता हिरावून घेतली. आता हेलेन एका अंधाऱ्या जगात जगत होती. तिच्याशी कोणाला बोलता येत नव्हते. तिच्या भविष्याची तिच्या पालकांना चिंता होती.



हेलनचे आईवडील तिला डॉ. अलेक्झांडर ग्राहम बेलकडे घेऊन गेले. त्यांनी टेलिफोनचा शोध लावला होता. आणि त्यांना बहिरेपणाबद्दल माहित होते.

त्यांनी हेलेन चतुर असल्याचे सांगितले. त्यांनी पर्किन्स इंस्टीट्यूटला पत्र लिहावे असे केलर्सना सुचवले. त्यांनीही पत्र पाठवले आणि त्यांना उत्तर मिळाले. ॲनी सुलिवन हेलेनची शिक्षिका म्हणून येणार होती.



ॲनीला नोकरी मिळाल्याचा आनंद झाला होता. ती तरुण आणि शक्तिशाली होती. ती धाडसी होती. शिवाय अंधांबद्दल तिला माहिती होती.

लौरा ब्रिजमेनवर असणाऱ्या डॉ. होएसच्या नोंदी तिने सर्वप्रथम वाचून काढल्या. लॉरादेखील हेलेनसारखी होती. एनीला जे जे करणे शक्य आहे ते ती समजून घेत होती. ॲनीचे काम अवघड होते. त्यानंतर ॲनी लॉराला भेटायला गेली. टॅप करुन त्या एकमेकांशी बोलल्या. त्या वृद्ध महिलेलाही हेलेनबद्दल जाणून घ्यायचे होते. तिने हेलेनला देण्यासाठी एनीजवळ एक बाहुली दिली.





हेलेन घरी वाट बघत होती. काहीतरी वेगळे घडणार असल्याची तिला जाणीव होत होती. एनीने एका उदास आणि हरवलेल्या मुलीला बसलेले बघितले. हेलेन तिच्या अंधाऱ्या जगातून बाहेर यावी म्हणून एनीने पूर्ण मनापासून प्रयत्न केले.

काहीही न शिकलेल्या हेलेनला एनीने थोड्याच वेळात बघितले. हेलेनच्या वागण्यामुळे तिच्या पालकांना दुःख होई म्हणून एनीला योग्य वाटेल ते करण्याची त्यांनी तिला परवानगी दिली. हेलेन स्वतःला जे हवे ते ओरबाडून घेई, अगदी दुसऱ्याच्या ताटातील जेवणही! एनीलाही हेलेनबद्दल खूप वाईट वाटले. पण तरीही तिला सामान्य माणसाप्रमाणे वागवायचे तिने ठरवले.





त्या घरातील पहिल्या जेवणाच्यावेळी एनी हेलेनच्या शेजारी बसली. तिने जेवण हातात घेऊन तोंडात कोंबणाऱ्या लहान मुलीला थांबवले. हेलेनला आश्चर्याचा धक्का बसला आणि तिला रागही आला. ती जोरजोरात पाय आपटू लागली. एनीने घरातील बाकी साऱ्यांना खोलीतून बाहेर जायला सांगितले. एनीने दरवाजाही बंद केला जेणेकरुन हेलेनला पळून जाता येऊ नये. हेलेनने दरवाज्याला लाथ मारली आणि एनीच्या अंगावर धावून गेली. ती खूप आराडाओरडा करायला लागली. ती जमिनीवरही लोळली. एनीने तिला खुर्चीवर बसून तिच्याच  ताटातील जेवण चमच्याने खायची सक्ती केली. रुमालाचा उपयोगही शिकवला. हे सारे शिकण्यासाठी खूप वेळ लागला. एनी थकली होती. तिने हेलेनला जाऊ दिले. स्वतःही खोलीत गेली आणि पलंगावर पडून रडायला लागली.



थोड्यावेळाने एनीला बरे वाटू लागले. तिला एक कल्पना सुचली. हेलेनला तिच्या कुटुंबापासून दूर घेऊन जायचे तिने ठरवले. हेलेनला घरापासून दूर एनीजवळ रहावे लागणार होते आणि एनीचे ऐकावे लागणार होते. दुसऱ्या दिवशी तिने कप्तान केलरना ती आणि हेलेन दोघींनीच थोड्या दिवसांसाठी एकत्र रहाण्यासंबंधी विचारले. कप्तानांना ही कल्पना रुचली नाही. हेलेनला ताब्यात आणण्यासाठी एकमेव कल्पना असल्याचे एनीने सांगितले. अखेरीस ते तयार झाले.





जवळच असणाऱ्या एका छोट्या घरात एनी हेलेनला घेऊन गेली. तिच्या कल्पना प्रत्यक्षात आणण्याची सुरुवात वाईट झाली. हेलेन एनीला स्पर्शही करु देत नव्हती. एनी तिला रात्री झोपवायला गेली तेव्हाही ती भांडली. पण अखेरीस दमून गेल्याने तिला झोप लागली. सकाळी उठल्यावर एनीने हेलेनला कपडे दिले. हेलेनने ते खाली फेकून दिले. हेलेनने कपडे बदलेपर्यंत एनीने तिला नाश्ता दिला नाही. काही दिवस हे असेच चालू होते.



हेलेनकडे ताकद होती, शिवाय ती हट्टी होती. पण एनीही तेवढीच हट्टी आणि जरा अधिक शक्तिशाली होती.



एके दिवशी कप्तान आले आणि त्यांनी खिडकीतून पाहिले. त्यांनी हेलेनला खाली फरशीवर रात्रीच्या कपड्यातच बसलेले पाहिले. त्यांना राग आल्याचे एनीला कळले. तिला पुन्हा बोस्टनला पाठवायचा विचार असल्याचे तिला नोकराडून समजले. पण एनी तिच्या निश्चयावर ठाम होती. हेलेनकडे जाण्यापूर्वीच हेलनला शांत करायला हवे असल्याचे तिच्या लक्षात आले.



जेव्हाजेव्हा ॲनी आणि हेलेनमध्ये संघर्ष होई तेव्हातेव्हा ॲनी हेलेनच्या हातावर शब्द “टॅप” करत असे. हेलेनने हे पटकन अवगत केले. पण तरीही प्रत्येकाला नाव असते हे तिच्या लक्षात येत नव्हते. प्रत्येक नावाला एक शब्द असतो आणि अनेक शब्दांनी वाक्य तयार होते हे तिला समजत नव्हते.





अखेरीस हेलेन जरा बरे वाटू लागली. ॲनीच्या डायरीत तिने नोंदवले की ॲनी आता तेवढी आक्रमक राहिली नव्हती. ॲनी आता तिला हात लावू शकत होती. अगदी हेलेनला मांडीवर बसवतही होती. दोन आठवड्यानंतर ॲनी आणि हेलेन पुन्हा त्यांच्या मोठ्या घरी परतल्या. हेलेनमध्ये झालेले बदल पाहून केलर्सही खूष झाली. आता ती एकाजागी शांत बसून बाहुल्यांशी खेळू शकत होती. ॲनीने आता त्या कुटुंबाला बोटांवरील अक्षरे शिकवली जेणेकरुन तेही हेलेनसोबत संवाद साधू शकतील.



वसंत सुरु झाला आणि अलाबामची हवा खूप सुंदर झाली. ॲनी हेलेनला बराच वेळ घराबाहेर फिरवत असे. त्या दोघी शेतातले प्राणी पहायला जात, कधी जंगलातून फिरुन येत. ॲनीला बऱ्याच गोष्टी स्पर्शाने आणि वासाने ओळखता येऊ लागल्या. तिची बोटे सतत त्या शब्दांसाठी हेलेनच्या हातावर “टॅप” करत असत. काहीवेळा तर शब्द आणि वस्तू यांची गल्लत होई.



"मग" आणि “पाणी” ह्या दोन शब्दात तिची गल्लत होत होती. तो गोंधळ दूर करण्यासाठी तिला एक मार्ग सुचला. ती हेलेनला घराबाहेरच्या पाण्याच्या पंपावर घेऊन गेली. हातामध्ये मग दिला जेणेकरुन पंपावरच्या पाण्याने तो मग भरला जाईल. पंपातून वेगाने पाणी बाहेर आले आणि हेलेनच्या हातावर पसरले. जसे पाणी हातावर आले ॲनीने “पाणी” असे टॅप करुन दाखवले.





अचानक हेलेनचा चेहरा बदलला. अंगात एकदम चैतन्य संचारले आणि ती स्वतःच “पाणी” असे वारंवार बोलू लागली. तिने पंपाकडे हात दाखवला, पुन्हा मैदानावर गेली आणि त्या सर्वांची नावे विचारायला लागली. हेलेन स्पर्श करे त्या प्रत्येक वस्तूचे ती आता नाव विचारु लागली. अगदी कमी वेळात तिने तीस नवे शब्द शिकून घेतले. ॲनी खूप खूष होती. अखेरीस काळोख्या जगाला छेदून बाहेर आल्याचे तिला कळले होते. तिने हेलेनला तिच्या आजूबाजूच्या जगासाठी एक किल्ली दिली होती – भाषेची किल्ली!



त्यानंतर हेलेनला ॲनीला तिचे नाव विचारले. ॲनीने “टीचर” असे सांगितले. त्यानंतर कायम हेलनसाठी ॲनीचे हे नाव होते.

त्यारात्री हेलेनने ॲनीला मिठी मारली आणि तिचा पापा घेतला. ॲनी आनंदाने वेडी झाली होती. तिला माहित होते की हेलनचे तिच्यावर प्रेम होते. हेलेनला मदत करण्यात तिला तिचे आयुष्य घालवायचे होते ह्याची ॲनीला जाणीव होती.



ॲनीच्या नोकरीचा पहिला भाग समाप्त झाला होता. पुढची काही वर्षे तिने हेलेनला घरी शिकवले. हेलेन हुषार आणि चाणाक्ष होती. ती खूप पुढे जाईल ह्याची हेलेनला खात्री होती.

हेलेनला इतरही लोक अनेक गोष्टी शिकवतील हे ॲनाला माहित होते. तिने केलर्सना हेलनला पुढच्या अभ्यासासाठी पर्किन्स इंस्टिट्यूटला जाण्यासाठी परवानगी मागितली. आता केलर्सचाही ॲनीवर प्रचंड विश्वास होता. ते तयार झाले.

पर्किन्समध्येसुद्धा हेलेनला शिकवण्यासाठी ॲनी सतत तिच्यासोबत असे. तिने हेलनला इतरांशी कसे बोलयचे, कसे ऐकायचे हे शिकवले. हेलन एका हाताची बोटे समोरच्या माणसाच्या ओठांवर, नाकाजवळ किंवा गळयावर ठेवीत असे. तिला आवाज स्पर्शातून जाणवत असत आणि ती ते समजून घेई.

ॲनीच्या कामामुळे हेलेन केलर प्रसिद्ध झाली. जगभरातील लोक तिला ओळखू लागले. अनेक जण तिला भेटायला आले. ॲनीलाही अनेक नोकऱ्या आता सांगून यायला लागल्या. पण तिने हेलेनला कधीही सोडले नाही. कप्तान केलर निवर्तल्यानंतर श्रीमती केलर यांनी हेलेनची जबाबदारी ॲनीवर सोपवली.







कॉलेजमध्येही ॲनीने हेलेनची खूप मदत केली. ती तिच्या प्रत्येक वर्गात तिच्याशेजारी बसे. हेलेनचा प्रत्येक अभ्यास ॲनीला वाचावा आणि अभ्यासावा लागे. तिच्या ह्या वाचनाने तिचे डोळे बरेचदा दुखत असत. स्नातक पदवी समारंभाच्या दिवशी ॲनीही हेलेनसोबत रंगमंचावर होती. तिला तिच्या विद्यार्थिनीचे कौतुक होते, जी आता एक सुंदर तरुणी होती.

हेलेनच्या पदवीनंतरचे दिवस ॲनीसाठीही आनंददायी होते. त्या दोघींनी एक मोठे घर खरेदी केले. त्यांना भरपूर मित्र होते. ॲनीला जेवण बनवायला आणि मनोरंजन आवडत असे. तिने जॉन मॅकी ह्या लेखकाशी लग्न केले. ॲनीने लग्न होण्याअगोदर हेलेन कायम त्यांच्यासोबत राहील याची खात्री करुन घेतली. जॉन आणि ॲनीने हेलेनला तिचे पहिले पुस्तक पूर्ण करायला मदत केली. “दि स्टोरी ऑफ माय लाईफ” हे जगातील लोकप्रिय पुस्तकांमधील एक झाले.



ॲनी खूप मेहनत घेत होती. ती हेलेनचे लिखाण वाचायची आणि त्यात सुधारणा करायची. ती कायम हेलेनसोबत फिरायची आणि हेलेन काय सांगते ते समजवायची. घरातही कामे असत. एकदा ॲनी आजारी पडली आणि लवकर आजारातून उठण्यासाठी दुसरीकडे रहायला गेली. तिला डोळयांचाही त्रास होऊ लागला. जॉनही गेला आणि ह्या दोघींना त्यांचे मोठे घर विकावे लागले. त्यांच्याकडचे जवळपास सगळे पैसेही संपले. ॲनी आणि हेलेन दोघींपैकी कोणीच पैसे साठवले नव्हते. त्यांनी ते गरीबांना दिले होते. अंधासाठी असणाऱ्या अमेरिकन फाऊंडेशनला त्या कायम मदत करायच्या. पहिल्या महायुद्धात अंध झालेल्या जवानांना त्यांनी हेलेनच्या पुस्तकातून आलेले पैसे दिले.





महायुद्ध संपल्यानंतर ॲनी आणि हेलेन हॉलीवूडला गेल्या. त्यांनी हेलेनच्या आयुष्यावर चित्रपट काढला. तसेच त्यांनी अनेक शहरातून प्रयोग केले. हे प्रयोग खूप गाजले आणि त्या दोघींना सुखाने रहाता येतील एवढे पैसे त्यांच्याजवळ जमा झाले. ह्या वेळपर्यंत ॲनीचे डोळे खूप खराब झाले. तरीही तिने दुसरे पुस्तक पूर्ण करण्यात हेलेनला मदत केली. त्यानंतर तिला डोळयांनी अजिबात बघता येईनासे झाले. बहुतांशी ती अंध झाली.



पण आता तिच्याकडे तिला मदत करायला पॉली थॉमसन होती. पॉली एक आनंदी स्कॉच मुलगी होती. ॲनीने पॉलीला हेलेनसोबत काम कसे करायचे ते शिकवले.



आयुष्याच्या अखेरच्या टप्प्यात ॲनी सुलिवनला अनेक किताब मिळाले. ती हेलेन केलरसोबत पन्नासहून अधिक वर्षे होती, तिची शिक्षिका म्हणून, तिची जोडीदार म्हणून. ॲनीशिवाय हेलेन राहू शकणार नाही असे काही लोकांना वाटायचे. पण ॲनी सर्वकाही जाणून होती आणि हेलेनही. तिची "टीचर" गेल्यानंतरही ती अनेक वर्ष जगली. ॲनी सुलीवनने तिला चांगले धडे दिले होते.

**समाप्त**